महात्मा जोतिराव फुले शेतकरी कर्जमुक्ती योजना २०१९ या योजनेसाठी आकस्मिकता निधीतून रक्कम वितरीत करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोदयोग विभाग**
**शासन निर्णय क्र. अर्थसं- ०२२०/ प्र.क्र.३३/२-स**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक : ०४ मार्च, २०२०

वाचा :- १) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र. कृकमा १२१९/प्र.क्र.१५७/२-स, दि.२७.१२.२०१९
२) वित्त विभाग, ज्ञापन क्र. आकनि - २०२०/प्र.क्र.३ /अर्थ-१३, दि.२०.२.२०२०
३) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र. अर्थसं-०२२०/प्र.क्र.३३/२-स, दि.२०.२.२०२०
४) वित्त विभाग, ज्ञापन क्र. आकनि - २०२०/प्र.क्र.३ /अर्थ-१३, दि.२६.२.२०२०
५) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र. अर्थसं-०२२०/प्र.क्र.३३/२-स, दि.२६.२.२०२०
६) वित्त विभाग, ज्ञापन क्र. आकनि - २०२०/प्र.क्र.३ /अर्थ-१३, दि.२७.२.२०२०
७) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र. अर्थसं-०२२०/प्र.क्र.३३/२-स, दि.२७.२.२०२०
८) वित्त विभाग, ज्ञापन क्र. आकनि - २०२०/प्र.क्र.३ /अर्थ-१३, दि.३.३.२०२०
९) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र. अर्थसं-०२२०/प्र.क्र.३३/२-स, दि.३.३.२०२०
१०) वित्त विभाग, ज्ञापन क्र. आकनि - २०२०/प्र.क्र.३ /अर्थ-१३, दि.४.३.२०२०

प्रस्तावना :-

दि.१.४.२०१५ ते दि. ३१.३.२०१९ पर्यंतच्या कालावधीसाठी अल्पमुदतीचे पीक कर्ज घेतलेल्या, तसेच, या कालावधीत अल्पमुदतीच्या पीक कर्जाचे पुनर्गठन / फेरपुनर्गठन केलेल्या शेतक-यांना दिलासा देण्यासाठी "महात्मा जोतिराव फुले शेतकरी कर्जमुक्ती योजना २०१९" ही कर्जमुक्ती योजना संदर्भ क्र.१ च्या शासन निर्णयान्वये जाहीर करण्यात आली आहे. सदर योजनेचा लाभ पात्र लाभार्थ्यांना तातडीने दयावयाचा आहे. सदर प्रयोजनासाठी वित्त विभागाच्या संदर्भ क्र.२ येथील ज्ञापनान्वये रु.१,००० कोटी व संदर्भ क्र.४ येथील ज्ञापनान्वये रु.२,५०० कोटी आणि संदर्भ क्र.६ येथील ज्ञापनान्वये रु.२,५०० कोटी तसेच संदर्भ क्र.८ येथील ज्ञापनान्वये रु.२,००० कोटी आकस्मिकता निधीतून मंजूर झालेला निधी संदर्भ क्र.३, ५, ७ व ९ येथील शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आला आहे. सदर प्रयोजनासाठी वित्त विभागाच्या संदर्भ क्र.१० येथील ज्ञापनान्वये आकस्मिकता निधीतून अतिरिक्त रु.२,००० कोटी इतका निधी मंजूर झालेला आहे. सदर मंजूर निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

“महात्मा जोतिराव फुले शेतकरी कर्जमुक्ती योजना २०१९” या कर्जमुक्ती योजनेअंतर्गत पात्र लाभार्थ्यांना दयावयाच्या लाभासाठी रु.२,००० कोटी (रुपये दोन हजार कोटी) इतका निधी वितरीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी आकस्मिकता निधीमधून खर्च करण्यासाठी आहरण व संवितरण अधिका-याकडे रक्कम सुपूर्द करण्यासंबंधीच्या आदेशात/ पत्रात आगाऊ रकमेतून खर्च करताना कोषागारात सादर करण्यात येणा-या देयकावर **“आकस्मिकता निधी अग्रीम वित्त विभाग, ज्ञापन क्र. आकनि-२०२०/प्र.क्र.३/अर्थ-१३, दि.४.३.२०२० अन्वये मंजूर” असे लाल शाईने लिहावे अशा स्पष्ट सूचना नमूद करण्यात याव्यात. ही सूचना लाल शाईने अधोरेखित करावी.**

३. सदर खर्च खालील लेखाशिर्षांतर्गत भागविण्यात यावा.

मागणी क्र. व्ही-०२
२४३५-- इतर कृषिविषयक कार्यक्रम,
६० - इतर,
१०१ -- शेतक-यांसाठी कर्ज माफी योजना,
(००) (०३) महात्मा जोतिराव फुले शेतकरी कर्जमुक्ती योजना- २०१९ (राज्य स्तर) (कार्यक्रम)
(२४३५ ०१४२)-३३ अर्थसहाय्य
आकस्मिकता निधी संकेतांक (८०००७६५४)

४. सदर तरतूद खर्च करण्यासाठी सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे अधिनस्त सहाय्यक निबंधक (अंदाज व नियोजन), सहकार आयुक्त कार्यालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात आले आहे. तसेच लेखाधिकारी, अधिन सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात आले आहे. सदर निधी आहरण करुन हा खर्च वेळेत होईल हे सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी पहावे. तसेच या बाबतचा अहवाल व खर्चाची माहिती वेळोवेळी शासनास पाठवावी.

५. सदर शासन निर्णय नियोजन विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्रमांक ६३/१४३१, दि.१२.२.२०२० व वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्रमांक १०५/२०२०/ व्यय-२, दि.१४.२.२०२० आणि वित्त विभाग, ज्ञापन क्र. आकनि - २०२०/प्र.क्र.३ /अर्थ-१३, दि.४.३.२०२० अन्वये प्राप्त झालेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०२००३०४१२२९३७३५०२ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

Ramesh Shankarrao Shingte

Digitally signed by Ramesh Shankarrao Shingte
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Cooperation, Marketing And Textile Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=fed1b2ed6e1e4aca719170d9eae8aa251ee28dc56c75d8a65acb34103d45bd48, serialNumber=b9bf7a534d8f1272bd902482bf95b556a5baefdddce18574a78fa2d8d0957d1f, cn=Ramesh Shankarrao Shingte
Date: 2020.03.04 12:32:00 +05'30'

**( रमेश शिंगटे )**
अवर सचिव तथा सहनिबंधक,
सहकारी संस्था, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
२) मा. मंत्री, सहकार यांचे खाजगी सचिव
३) मा. विधानसभा सदस्य / विधानपरिषद सदस्य (सर्व)
४) मा. मुख्य सचिव यांचे उप सचिव
५) अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
६) सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, पुणे
७) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर
८) महालेखापाल (लेखा परिक्षण), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर
९) जिल्हा कोषागार अधिकारी (सर्व)
१०) विभागीय सहनिबंधक, सहकारी संस्था (सर्व)
११) जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था, (सर्व)
१२) कार्यासन अधिकारी (व्यय-२/ अर्थ-३ / अर्थ- १३) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१३) अवर सचिव (१७-स), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१४) निवडनस्ती.